सुधारित आकृतीबंधामध्ये वैधमापन शास्त्र यंत्रणेसाठी मंजूर केलेल्या पदांचे क्षेत्रिय स्तरावर फेरवाटप करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: वैमाशा-२०२२/प्र.क्र.११३/ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मुंबई- ४०० ०३२
दि. : २७ मार्च, २०२३

वाचा:- १) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र. वैमाशा-२०२२/प्र.क्र.७४ ग्रास-३, दि.- १४ ऑक्टोबर २०२२

**शासन निर्णय :-**

संदर्भिय शासन निर्णयान्वये वैधमापन शास्त्र यंत्रणेसाठी मंजूर असलेल्या पदांचे क्षेत्रिय स्तरावर फेरवाटप करण्यात आलेले आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद ५ अन्वये परिशिष्ट “ब” व परिशिष्ट “क” मध्ये सहायक नियंत्रक यांची कार्यालयनिहाय पदसंख्या निश्चित केलेली असून सहायक नियंत्रक यांच्यासाठी स्वतंत्रपणे पदे चिन्हांकित करण्यात आलेली आहेत. तथापि सहायक नियंत्रक व निरीक्षक या पदांच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या समान असल्यामुळे तसेच वेतन सुधारणा समितीच्या अहवालानुसार सदर दोन्ही संवर्गाची वेतनश्रेणी एस-१४ अशी समान झाल्यामुळे आता या शासन निर्णयान्वये सहायक नियंत्रक यांच्यासाठी केलेले चिन्हांकन रद्द करण्यात येत आहे.

दि. १४ ऑक्टोबर २०२२ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “ब” व परिशिष्ट “क” मध्ये क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयात सहायक नियंत्रक व निरीक्षक यांची स्वतंत्रपणे जेवढी एकूण पदे दर्शविली आहेत त्यांच्या एकूण बेरजे एवढी पदे सहायक नियंत्रक/निरीक्षक या संवर्गासाठी मंजूर करण्यात येत आहेत. सदर पदावर “सहायक नियंत्रक” किंवा “निरीक्षक” यापैकी कोणत्याही एका संवर्गातील अधिकाऱ्याची पदस्थापना करण्यात येईल.

दि. १४ ऑक्टोबर २०२२ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट “अ” व परिशिष्ट “क”या मध्ये फेरवाटपानंतर अस्तित्वात आलेले जिल्हे यामध्ये परभणी ऐवजी परभणी-हिंगोली व अकोला ऐवजी अकोला-वाशिम असा बदल करण्यात येत आहे. तसेच सदर शासन निर्णयामध्ये ज्याठिकाणी “औरंगाबाद” असा उल्लेख आहे त्याठिकाणी “छत्रपती संभाजीनगर” व ज्याठिकाणी “उस्मानाबाद” असा उल्लेख आहे त्याठिकाणी “धाराशिव” असा बदल करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२७२११४४५९५०६ असा आहे. हा शासन निर्णय डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकन करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR

Digitally signed by CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0496C0C213A3F50C6522CC39AE5DE95E1150AC3287E89C21B1422E313820A2, cn=CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
Date: 2023.03.28 18:18:44 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, (अ.ना.पु व ग्रा.सं. वि.) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री, (अ.ना.पु व ग्रा.सं. वि.) यांचे खाजगी सचिव
३) विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद.
४) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा व परिक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखाव परिक्षा), महाराष्ट्र , नागपूर.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे उपसचिव.
८) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
९) सर्व विभागीय आयुक्त.
१०) सर्व सहसचिव/उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
११) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा विभाग, मुंबई.
१६) सर्व विभागीय सहनियंत्रक, वैध मापन शास्त्र.
१७) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
१८) सर्व जिल्हा उपनियंत्रक, वैध मापन शास्त्र.
१९) वित्त विभाग (व्यय-१०, आयुक्त कक्ष, वित्तीय सुधारणा, सेवा-९, अर्थसंकल्प-११ मंत्रालय मुंबई.
२०) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, कार्यासन-नापु-१२.
२१) निवडनस्ती-ग्रासं-३.